# चला वटवाघळांसंबंधीचे गैरसमज दूर करूयात चिकू आणि मिकूसोबत!

मिथक क्र. १ - वटवाघूळ हा एक निरुपयोगी प्राणी आहे.

Concept: Rajesh Puttaswamaiah

## Myth 1: Bats are useless animals

Illustration: Rohan Chakravarty












Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| शीsss! काय हे कुरूप, निरुपयोगी जनावर! खरंच काही उपयोग आहे का रे आपल्याला या वटवाघळांचा? | ओऽ! नमस्कार! आणि केलेल्या स्तुतीबद्दल खूप आभारही! माफ करा पण आपल्या माहितीस्तव थोडस स्वतःविषयी बोलतो, माझं नाव चिकू, मी एक फळांवर जगणारा वटवाघूळ आहे. फळझाडांच्या बिया आणि परागकणांचा प्रसार करून जंगलांच्या पुनार्जीवनात माझी भुमिका महत्वाची असते! | आणि मी मिकू, किटकांवर जगणारा वटवाघूळ. कीटक नियंत्रणात माझं स्पॅशलायझेशन आहे. आणि माझ्या आईला तर मी आसपासच्या सगळ्यांपेक्षा सुंदर दिसतो - लहानसा, सावळा आणि हॅंडसम पण! |

# मिथक क्र. २ - वटवाघूळे माणसांवर हल्ला करतात

# Myth 2: Bats attack humans

Concept: Rajesh Puttaswamaiah

Illustration: Rohan Chakravarty










Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| वटवाघूळे माणसांवर हल्ला करत नाहीत? नानी म्हणते ते माणसाचे डोळे काढून घेतात! | हा हा हा!!! काय राव चेष्टा करता गरीबाची! तुमच्यापेक्षा आकाराने दहापट लहान असतो आम्ही आणि मी तर तालमीला म्हणजेच ते जिम कि काय म्हणता तुम्ही त्यालापण जात नाही बघा! | खर सांगू का? आम्हाला पण तुमची तेवढीच भीती वाटते जेवढी तुम्हाला आमची वाटते! म्हणून तर आम्ही झाडांवर आणि दगडा-धोंड्याच्या आणि भिंतींच्या चिरा-कपारींमध्ये राहतो. |

# मिथक क्र. ३ - वटवाघूळे माणसांच रक्त पितात

Concept: Rajesh Puttaswamaiah

## Myth 3: Bats drink human blood

Well, don't you creepy guys drink human blood?







Illustration: Rohan Chakravarty

Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| बर एक सांग. भुताचे भाऊ तुम्ही, माणसाचं रक्त पिता ना? | इsssss! अजिबात नाही! अरे काय काय खाता तुम्ही - जनुकीय बदल केलेली पिके, हायब्रीड धान्ये, कीटकनाशके, रासायनिक खते, परीरक्षके (प्रीझर्वेटिव्ह). बाप रे! तुमच रक्त म्हणजे विषच कि राव, ते पिऊन आम्हाला काय मरायचंय?! | दक्षिण अमेरिका आणि मेक्सिकोमध्ये आढळून येणारी रक्तशोषक वटवाघूळेच फक्त रक्त पितात - तेही काही प्राण्यांचे, मनुष्याचे नाही. ते त्या प्राण्यांच्या शरीरावर आपल्या दातांनी छोटासा दंश करतात आणि त्यातून रक्त साकळनरोधी (अँटीकॉग्युलंट) द्रव्य सोडतात. मग त्याचे रक्त शोषण करतात आणि हे त्या प्राण्याच्या लक्षातही येत नाही |

# मिथक क्र. ४ - वटवाघूळ म्हणजे अपशकून

# Myth 4: Bats bring bad luck

Concept: Rajesh Puttaswamaiah

Illustration: Rohan Chakravarty










Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| बर बर, पण काही झाले तरी मी तुला माझ्या घरात येऊ देणार नाही! आई म्हणते तू अपशकुनी आहेस म्हणून! | कमाल आहे तुमची! मी फक्त तुमच्या बॉलीवूडच्या हिरोंप्रमाणे “फेअर अँड लव्हली” दिसत नाही म्हणून मी अपशकूनी झालो का?! | जरा विचार करा! तुम्हीच आमची घरे उध्वस्त करता आणि आम्हालाच अपशकुनी म्हणता! कोण कोणासाठी खरा अपशकून ठरतो? |

# मिथक क्र. ५ - वटवाघूळे आंधळी असतात

# Myth 5: Bats are blind

Concept: Rajesh Puttaswamaiah

Illustration: Rohan Chakravarty










Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| आम्हाला माफ कर आम्ही हा विचार कधीच केला नाही रे! अरे पण एक सांग, तुला कसे काय कळले कि आम्ही येथे उभे आहोत आणि तुझ्याबद्दल बोलत आहोत? आम्ही तर ऐकल होत कि वटवाघूळे आंधळी असतात म्हणून! | बिलकुल नाही! तुम्ही माझ्या डोळ्यांच्या डॉक्टरांना फोन करून विचारून घ्या हवे तर! आम्हा फळांवर जगणाऱ्या वटवाघळांचे जीवन तर दृष्टीवरच अवलंबून आहे. प्रकृतीने आम्हाला सुंदर आणि मोठे डोळे दिलेत! | याउलट किटकांवर जगणाऱ्या आम्हा वटवाघळांचे डोळे लहान असतात कारण अंधारात आम्ही मुख्यत्वे 'प्रतिध्वनीद्वारे स्थान ओळखणे' (echo-location) ही पद्धत वापरतो. परंतु याचा अर्थ आम्ही आंधळे आहोत असा नाही. हे बघा एक.. दोन..दोन बोटे, आहे ना बरोबर? |

# मिथक क्र. ६ - वटवाघूळ म्हणजे कीटक

# Myth 6: Bats are pests

Concept: Rajesh Puttaswamaiah










Illustration: Rohan Chakravarty

Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| तुम्ही तर खूपच चांगले आहात तुमच्याशी मैत्री करायला कोणाला आवडणार नाही! पण शासन दरबारी तुमचा उल्लेख कीटक म्हणून का केला जातो? | छे! सरकारला काहीच माहिती नाही! कधीतरी पोटाची भूक भागविण्यासाठी आम्ही एखाद्या फळबागेवर धाड टाकली म्हणून आम्हाला कीटक म्हणतात ते! परंतु 'बियांचे प्रसारक' म्हणून जी भूमिका आम्ही वठवतो ती आमच्याकडून अनावधानाने झालेल्या नुकसानीपेक्षा कितीतरी जास्त महत्वाची आहे! | आणि माझ्या बाबतीत बोलायचे झाले तर डोके ठिकाणावर असलेला कोणताही साधारण माणूसही तुम्हाला सांगेल कि कीटकभक्षी वटवाघूळ म्हणजे कीटनियंत्रक, त्याला कीटक कसे म्हणता येईल?! |

# मिथक क्र. ७ - वटवाघूळे रेबीज पसरवतात

# Myth 7: Bats carry Rabies

Concept: Rajesh Puttaswamaiah










Illustration: Rohan Chakravarty

Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| चिकू आणि मिकू आम्हाला माफ करा! तुमच्याबद्दल एवढे सगळे गैरसमज आम्ही मनात बाळगले. जर तुम्हाला रेबीज नसेल ना तर खरंच आम्हाला तुमच्याशी मैत्री करायला खूप आवडेल! | हम्म..चुकलात ना पुन्हा! हा तुमचा सातवा गैरसमज! | वटवाघळांच्या फक्त काही प्रजाती या अशा एका विषाणूच्या वाहक असतात जो रेबीजसारखा असतो. वटवाघळांकडून संसर्ग होण्याची शक्यता ही कुत्र्यांकडून संसर्ग होण्याच्या शक्यतेच्या तुलनेत अत्यंत कमी असते कारण आम्ही तुमच्या संपर्कात क्वचितच येतो. |

Concept: Rajesh Puttaswamaiah




Illustration: Rohan Chakravarty

Published By: Bat Conservation India Trust

| | | |
|---|---|---|
| चला तर आता तुमचे सगळे गैरसमज दूर झाले असतील तर आपण फळांची पार्टी करू यात! कारण तुम्हाला 'चहा प्यायला या' असे म्हटलो असतो पण मी स्वतः चहा पीत नाही! | आणि मीही तुम्हाला माझ्या अळ्यांच्या पार्टीला बोलावलं असतं पण मला नाही वाटत संध्याकाळचा नाश्ता म्हणून अळ्यांची चटणी तुम्हाला फारशी आवडेल म्हणून! | हा हा हा हा ! |